मसा. क्र. ७७–७८

रजिस्टर्ड नं. एमएच/एमबीआय-साऊथ/२०



# महाराष्ट्र शासन राजपत्र

असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

गुरुवार, मार्च ६, १९९७/फाल्गुन १५, शके १९१८

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत.

## भाग चार-ब

महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमान्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश

ग्रामविकास व जलसंधारण विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ६ मार्च १९९७

**मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८.**

क्रमांक जीपीएन. १०९६/सीआर-१८१/२१-जे.—मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ (सन १९५९ चा मुंबई अधिनियम तीन) याच्या कलम १२४ चे पोट-कलम (१) व कलम १७६ चे पोट-कलम (२) मधील खंड (सव्वीस) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा आणि त्या बाबतीत महाराष्ट्र शासनास समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व शुल्क नियम, १९६० यामध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी पुढील नियम करीत आहे. हे नियम उक्त कलम १७६ च्या पोट-कलम (४) अन्वये आवश्यक असल्याप्रमाणे, यापूर्वी प्रसिद्ध करण्यात आले आहेत.

१. या नियमांना महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व शुल्क (सुधारणा) नियम, १९९७ असे म्हणता येईल.

२. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व शुल्क नियम, १९६० चे नियम ८० (यात यापुढे याचा उल्लेख "मुख्य नियम" असा करण्यात आला आहे) मधील पोट-नियम (१) नंतर खालील पोट-नियमांचा समावेश करण्यात येईल :—

"(१-अ) सर्वसाधारण पाणीपट्टी ही नियम १८ खालील इमारत करासोबत वसूल करण्यात येईल."

३. मुख्य नियमांच्या नियम ९८ मधील पोट-नियम (२) नंतर खालील पोट-नियमाचा समावेश करण्यात येईल :—

"(अ) २० मिलीमीटर (३/४ इंच) व्यासाच्या पाण्याच्या नळाची जोडणी फक्त सार्वजनिक व व्यापारी संस्थांना अनुज्ञेय राहील."

४. मुख्य नियमास जोडलेल्या भाग-१२ मधील अनुसूची ऐवजी खालील अनुसूचीचा समावेश करण्यात येईल :—

## अनुसूची

(नियम १०१ पहावा)

१. भाग अ.—मीटर पद्धती व्यतिरिक्त इतर पद्धतीने पुरविण्यात येणाऱ्या पाण्याबाबत.—

| मोजमाप यंत्रविरहित घरगुती वापरासाठी | किमान | कमाल |
| --- | --- | --- |
| (१) १२ मिलीमीटर (१/२ इंच) व्यासाच्या नळ जोडणी-करिता. | प्रतिवर्षी रु. ३६० | प्रतिवर्षी रु. ४५० |
| (२) २० मिलीमीटर (३/४ इंच) व्यासाच्या नळ जोडणी-करिता. | प्रतिवर्षी रु. ७५० | प्रतिवर्षी रु. १,००० |

**मोजमाप यंत्रविरहित बिगर घरगुती वापरासाठी.**—मोजमाप यंत्रविरहित बिगर घरगुती वापरासाठी पाण्याचे दर हे मोजमाप यंत्रविरहित घरगुती वापरासाठी असलेल्या पाण्याच्या दरापेक्षा दुप्पट राहतील.

२. भाग ब.—मोजमाप यंत्राद्वारे पाणीपुरवठा दर—

| | दर |
| --- | --- |
| घरगुती वापरासाठी | |
| (१) प्रत्येक १,००० लिटर्स किंवा त्याचा भाग .. | रु. १.२५ अधिक १० पैसे अधिभार. |
| बिगर घरगुती वापरासाठी | |
| (२) प्रत्येक १,००० लिटर्स किंवा त्याचा भाग. .. | रु. २.५० अधिक २० पैसे अधिभार. |

३. भाग क.—खाजगी नळ जोडणी फी (शुल्क)—

| | |
| --- | --- |
| (१) १२ मिलीमीटर (१/२ इंच) व्यासाची नळ जोडणी .. | रु. ७५ |
| (२) २० मिलीमीटर (३/४ इंच) व्यासाची नळ जोडणी .. | रु. १२० |

४. भाग ड.—ग्रामपंचायतीच्या लोकसंख्येच्या आधारे खाजगी नळ जोडणीसाठी अनामत रकमा—

| | |
| --- | --- |
| (१) घरगुती वापरासाठी .. | रु. ५०० ते रु. १,००० |
| (२) बिगर घरगुती वापरासाठी .. | रु. १,००० ते रु. १,५०० |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

रा. का. पवार,

शासनाचे उप सचिव.

## RURAL DEVELOPMENT AND WATER CONSERVATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 6th March 1997

BOMBAY VILLAGE PANCHAYAT ACT, 1958.

No.GPN.1096/CR-181/21-A.—In exercise of the powers conferred by sub-section (*1*) of section 124 and clause (*xxvi*) of sub-section (*2*) of section 176 of the Bombay Village Panchayat Act, 1958 (Bom. III of 1959) and of all the powers enabling it in that behalf the Government of Maharashtra hereby makes the following rules further to amend the Bombay Village Panchayats Taxes and Fees Rules, 1960 the same having been published as required by sub-section (*4*) of the said section 176, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Village Panchayats Taxes and Fees (Amendment) Rules, 1997.

2. In Rules 80 of the Maharashtra Village Panchayats Taxes and Fees Rules, 1964 (hereinafter referred to as "the principal Rules"), after sub-rule (*i*), the following sub-rule shall be added, namely :—

"(IA). The General Water tax shall be recovered alongwith the tax on buildings recovered under rule 18."

3. In rule 98 of the principal Rules, after sub-rule (2), the following sub-rule shall be added, namely :—

"(*3*) The connection of water pipe of 20 millimetres (3/4 inch) diameter shall be admissible only to the public and commercial institutions.".

4. For the Schedule appended to Part XII of the principal Rules, the following Schedule shall be substituted, namely :—

*Schedule*

(*See* Rule 101)

1. Part A-For water Supplied otherwise than through Meter System—

| For Domestic use | Minimum | Maximum |
|---|---|---|
| (1) For connection of Water pipe of 12 millimetres (1/2 inch) diameter. | Rs. 360 per annum. | Rs.450 per annum. |
| (2) For connection of water pipe of 20 millimetres (3/4 inch) diameter. | Rs.750 per annum. | Rs.1,000 per annum. |

*For non-domestic use.*—The rate of non-domestic use shall be twice the rate fixed for supply of water through pipe connections of the respective sizes specified for domestic use.

2. Part B.—For Water Supplied through meter system—

| For domestic use | | Rate |
|---|---|---|
| (1) For every 1,000 litres or Part thereof | .. | Rs. 1.25 plus surcharge of 10 paise. |
| (2) For non-domestic use for every 1,000 litres or part thereof. | .. | Rs. 2.50 plus surcharge of 20 paise. |

3. Part-C.—Fees for private Water piped connection—

| | | |
|---|---|---|
| (1) For connection of water pipe of 12 millimetres (1/2 inch). | .. | Fee Rs.75. |
| (2) For connection of water pipe of 20 millimetres (3/4 inch) diameter. | .. | Fee Rs.120. |

4. Part D.—Deposit for private Water Pipe connections based on the population of Village Panchayat—

| | | |
|---|---|---|
| (1) For domestic use | .. | Rs. 500 to Rs.1,000. |
| (2) For non-domestic use | .. | Rs. 1,000 to Rs.1,500. |

By order and in the name of the Governor of Maharashtra,

R. K. PAWAR,
Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई